**कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील श्री. भालचंद्र भागवत नेमाडे व श्री. तरूण बलदेवराज जुनेजा, यांच्या 'कार्यकारी अभियंता' (स्थापत्य) या पदावरील नेमणुकीस, महानगरपालिकेच्या सेवाप्रवेश नियमातील तरतूदीनुसार शासन मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः- कडोंम-१०२३/ सं. क्र.५७४/प्र. क्र. ३९/नवि-२८**
मंत्रालय (मुख्य इमारत), ४ था मजला, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांकः- १६ जून, २०२३

**संदर्भः-** १) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.कडोंम-१०२०/प्र.क्र. ०३/नवि-२८, दि.०१.०६.२०२१.
२) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. कडोंम-१०१९/प्र.क्र.१३९/नवि-२८, दि.०१.०६.२०२१.
३) आयुक्त, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका यांचे पत्र क्र. कडोंमपा/ साप्र/ टे.नं.९/३९२०, दि.०७.०२.२०२३.

**प्रस्तावना-**

कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेचा आकृतीबंध दि.०१.०६.२०२१ च्या शासन निर्णयान्वये मंजूर केलेला आहे. तसेच, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका सुधारित सेवा (सेवाप्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम, २०२१ ला दि.०१.०६.२०२१ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. त्यास अनुसरून दि.३०.०५.२०२२ रोजीच्या बैठकीत पदोन्नती निवड समितीने केलेल्या शिफारशीनुसार व दि.३०.०५.२०२२ च्या प्रशासकीय ठराव क्र. १० नुसार दि. ३१.०५.२०२२ च्या आदेशान्वये, श्री. भालचंद्र भागवत नेमाडे व श्री. तरूण बलदेवराज जुनेजा, 'उप अभियंता' (स्थापत्य), यांना, जेष्ठतेनुसार खुल्या प्रवर्गात निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुमती याचिका क्र. २८३०६/२०१७, तसेच, दि.०७.०५.२०२१ रोजीच्या शासन निर्णय प्रकरणी, मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल केलेल्या याचिकेवरील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून 'कार्यकारी अभियंता' (स्थापत्य), या पदावर पदोन्नती देण्यात आलेली आहे. या पदोन्नतीस/पदस्थापनेस, महानगरपालिकेच्या सेवाप्रवेश नियमातील तरतूदीनुसार, शासन मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव दि.०७.०२.२०२३ च्या पत्रान्वये महानगरपालिकेने शासनास सादर केला आहे.

२. श्री. भालचंद्र भागवत नेमाडे व श्री. तरूण बलदेवराज जुनेजा, 'उप अभियंता' (स्थापत्य), यांच्या 'कार्यकारी अभियंता' (स्थापत्य) पदावरील नेमणुकीस, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका प्रशासकीय ठराव क्र. १०, दि.३०.०५.२०२२ अन्वये, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका सुधारित सेवा (सेवाप्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम-२०२१ मधील तरतूदीनुसार, शासन मान्यता मिळण्याच्या अधीन राहून मान्यता देण्यात आलेली आहे. त्याअनुषंगाने त्यांच्या 'कार्यकारी अभियंता' (स्थापत्य) या पदावरील नेमणुकीस शासन मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

आयुक्त, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका यांचेकडून संदर्भीय दि.०७.०२.२०२३ च्या पत्रान्वये प्राप्त प्रस्ताव, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका यांच्या दि.३०.०५.२०२२ च्या पदोन्नती समितीने केलेल्या शिफारशीनुसार, दि.३१.०५.२०२२ च्या आदेशान्वये, श्री. भालचंद्र भागवत नेमाडे व श्री. तरूण बलदेवराज जुनेजा, 'उप अभियंता' (स्थापत्य) यांना, जेष्ठतेनुसार खुल्या प्रवर्गात निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात, मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुमती याचिका क्र. २८३०६/२०१७, तसेच, दि.०७.०५.२०२१ रोजीच्या शासन निर्णय प्रकरणी, मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल केलेल्या याचिकेवरील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून 'कार्यकारी

अभियंता' (स्थापत्य), या पदावरील केलेली पदोन्नती विचारात घेता, श्री. भालचंद्र भागवत नेमाडे व श्री. तरूण बलदेवराज जुनेजा, 'उप अभियंता' (स्थापत्य), यांच्या 'कार्यकारी अभियंता' (स्थापत्य), कल्याण-डोंबिवली महानगरपालिका, या पदावरील पदस्थापनेस, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका सुधारित सेवा (सेवाप्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम, २०२१ मधील तरतूदीनुसार, शासन मंजुरी देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२३०६१६१९५५१८६६२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRATIBHA MADHAV PATIL

Digitally signed by PRATIBHA MADHAV PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=b693d975fffc642fe6b87c2ce9e1297fd1e8bda9b459f85f75f159984ba680fd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DA026E85AE8CBB4E3C2ACDBECBBF2F6D6CB0AE6ED5C1E54483490119EE0456AD, cn=PRATIBHA MADHAV PATIL
Date: 2023.06.16 19:57:21 +05'30'

**( प्रतिभा पाटील )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रतः-**

१) मा.मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) आयुक्त तथा प्रशासक, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका, जि. ठाणे.
३) प्रधान सचिव (नवि-२) महोदयांचे स्वीय सहाय्यक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) उप सचिव (नवि-२८), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) निवडनस्ती नवि-२८.